**धार्मिक अल्पसंख्यांक विद्यार्थी बहुल शासनमान्य खाजगी अनुदानित/विना अनुदानित/ कायम विना अनुदानित शाळा, कनिष्ठ महाविद्यालये, औद्योगिक प्रशिक्षण संस्था व अपंग शाळांमध्ये पायाभूत सोयी-सुविधा पुरविण्यासाठी अनुदान योजना.**

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्यांक विकास विभाग**
**शासन निर्णय क्रं. अविवि-२०१५/प्र.क्र. ८० /१५/का.६**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : ०७/१०/२०१५

<u>वाचा</u> :- १. शासन निर्णय क्र. अविवि-२००९/प्र.क्र. ५२/०९/का-१, दि. ५.२.२००९
२. शासन निर्णय क्र. अविवि-२००९/प्र.क्र. १५/०९/का-६, दि. १७.११.२००९
३. शासन निर्णय क्र. अविवि-२०१०/प्र.क्र. १००/०९/का-६, दि. २०.७.२०१०
४. शासन निर्णय क्र. अविवि-२०११/प्र.क्र. ३३/०९/का-६, दि. ४.७.२०११
५. शासन निर्णय क्र. अविवि-२०१२/प्र.क्र. ३६/१२/का-६, दि. १५.९.२०१२
६. शासन निर्णय क्र. अविवि-२०१३/प्र.क्र. ०८/०९/का-६, दि. १७.८.२०१३

**<u>प्रस्तावना :-</u>**

धार्मिक अल्पसंख्यांक विद्यार्थ्यांचे बाहुल्य असलेल्या राज्यातील शासन मान्यताप्राप्त अनुदानित/विना अनुदानित/कायम विना अनुदानित शाळा,कनिष्ठ महाविद्यालये, औद्योगिक प्रशिक्षण संस्था व अपंग शाळांमध्ये पायाभूत सोयी सुविधा उपलब्ध करुन देण्यासाठी रु.२.०० लक्ष इतके अनुदान देण्याची योजना सन २००८-०९ पासुन राबविण्यात येत आहे. गत सात वर्षामध्ये या योजनेला राज्यभरातील अल्पसंख्यांक शाळांकडून मिळालेला उत्स्फुर्त प्रतिसाद आणि सदर योजना यापुढेही चालू ठेवण्याची आवश्यकता विचारात घेऊन सदर योजना सन २०१५-१६ या वर्षापासून सुधारीत स्वरुपात राबविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सदर योजनेशी संबंधित उपरोक्त वाचा येथे नमूद अ.क्र. १ ते ६ येथील शासन निर्णय अधिक्रमित करण्यात येत असून याबाबत पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

धार्मिक अल्पसंख्यांक विद्यार्थ्यांचे बाहुल्य असलेल्या राज्यातील शासनमान्य शैक्षणिक संस्थांना पायाभूत सोयी-सुविधा उपलब्ध करुन देऊन शिक्षणाचा गुणात्मक दर्जा उंचावण्यासाठी शासनमान्य शाळांना पायाभूत सोईसुविधा निर्माण करण्यासाठी वार्षिक कमाल रु.२.०० लाख एवढया रकमेच्या मर्यादेपर्यंत अनुदान शासनाकडून उपलब्ध करुन देण्यात येईल.

**अ) <u>अनुदानासाठी पात्रता :-</u>**

१) शासन मान्यता प्राप्त अनुदानित /विना अनुदानित/कायम विनाअनुदानित खाजगी अल्पसंख्यांक

(अ) शाळा.

(ब) कनिष्ठ महाविद्यालये

(क) औद्योगिक प्रशिक्षण संस्था

(ड) नगरपालिका/नगरपरिषद शाळा

(इ) अपंग शाळा

(१) उपरोक्तपैकी अनु.क्र. (अ) ते (ड) येथील शैक्षणिक संस्थांमध्ये धार्मिक अल्पसंख्यांक विद्यार्थ्यांची संख्या किमान ७०% आणि अनु.क्र. (इ) येथील शाळांमध्ये धार्मिक अल्पसंख्यांक विद्यार्थ्यांची संख्या किमान ५०% असणे आवश्यक आहे.

(२) कनिष्ठ महाविद्यालय व औद्योगिक प्रशिक्षण संस्थांच्या अभ्यासक्रमांच्या समकक्ष दर्जा देण्यात आलेले अभ्यासक्रम चालविणाऱ्या शाळा व व्यावसायिक शिक्षण संस्था तसेच स्वंय-अर्थसहाय्यित शाळा या योजनेंतर्गत अनुदानासाठी पात्र असणार नाहीत.

(३) यापूर्वी या योजनेंतर्गत ५ वेळा अनुदान प्राप्त केलेल्या शाळा/संस्था अनुदानासाठी पात्र ठरणार नाहीत. अशा प्रकारच्या शाळा/संस्था वगळून फक्त पात्र शाळांचे प्रस्ताव सादर करण्याची जबाबदारी संबधित जिल्हाधिकारी कार्यालयाची राहील.

(४) महानगरपालिका व जिल्हा परिषदा या स्थानिक स्वराज्य संस्थांच्या अधिपत्याखाली चालविण्यात येत असलेल्या शाळा व कनिष्ठ महाविद्यालये व अपंग शाळा या योजनेसाठी पात्र असणार नाहीत.

**ब) <u>अनुदान देय असलेल्या पायाभूत सोयी-सुविधा</u>** :-

१) शाळेच्या इमारतीचे नुतनीकरण व डागडुजी,

२) शुध्द पेयजलाची व्यवस्था करणे,

३) ग्रंथालय अद्यावत करणे,

४) प्रयोगशाळा उभारणे / अद्ययावत करणे,

५) संगणक कक्ष उभारणे / अद्ययावत करणे

६) प्रसाधनगृह / स्वच्छतागृह उभारणे / डागडुजी करणे.

७) विद्यार्थ्यांसाठी आवश्यक फर्निचर

८) इन्वर्टर/ जनरेटरची सुविधा निर्माण करणे. (मुंबई शहर व उपनगरे वगळून)

९) झेरॉक्स मशीन

१०) अध्ययनाची साधने ( Learning Material )/ एल.सी.डी. प्रोजेक्टर, अध्ययनासाठी लागणारे विविध सॉफ्टवेअर, इत्यादी.

११) इंग्रजी लॅग्वेज लॅब

१२) संगणक हार्डवेअर/सॉफ्टवेअर

उपरोक्त सोयी-सुविधांसाठी अनुदान प्राप्त करण्यासाठी इच्छुक शैक्षणिक संस्थांनी शासन निर्णयासोबतच्या विहित नमुन्यात संबंधित जिल्हाधिकारी कार्यालयाकडे शासनाने निर्धारित केलेल्या अंतिम दिनांकापूर्वी प्रस्ताव सादर करणे आवश्यक आहे.

**क) <u>प्रस्तावा सोबत जोडावयाची कागदपत्रे :-</u>**

१) पूर्ण भरलेला अर्ज ( प्रपत्र-१)

२) संस्थेने प्रपत्र-१ प्रमाणे सादर करावयाचे स्वयंघोषणापत्र. (प्रपत्र-२)

३) संस्थेच्या सदस्यांची यादी (पुर्ण पत्ता व दुरध्वनी क्रमांकासह) (प्रपत्र-३)

४) निकषानुसार समुहनिहाय एकूण धार्मिक अल्पसंख्यांक विद्यार्थी ७०% व अपंग शाळांबाबत ५०% असल्याबद्दलचा संबंधीत गट शिक्षणाधिकारी/शिक्षण निरिक्षक/उप शिक्षणाधिकारी/ विशेष जिल्हा समाज कल्याण अधिकारी/ सहसंचालक, व्यावसाय प्रशिक्षण विभाग यांचा दाखला (प्रपत्र-४))

५) या पुर्वी घेतलेल्या अनुदानाचे उपयोगीता प्रमाणपत्र (प्रपत्र-५)

६) शाळा सुरु करण्यासाठी/सुरु ठेवण्यासाठी शासन मान्यतेच्या पत्राची सत्यप्रत

७) संस्थेच्या संदर्भात सादर करावयाची कागदपत्रे

i) नोंदणी प्रमाणपत्राची सत्यप्रत

ii) संस्थेच्या व्यवस्थापन समितीच्या विद्यमान विश्वस्त/सदस्य यांची नावे दर्शविणाऱ्या धर्मादाय आयुक्तांमार्फत प्रदान करण्यात आलेल्या अनुसूचीची प्रत.

८) इमारतीच्या आणि अथवा वर्ग खोल्यांच्या दुरुस्तीचा प्रस्ताव असल्यास नोंदणीकृत आर्किटेक्ट/लायसन्सड इंजीनियर सार्वजनिक बांधकाम विभाग/जिल्हा परिषद बांधकाम येथील उप अभियंता यांनी दिलेले अंदाजपत्रक व आराखडे. अंदाजपत्रक हे प्रचलीत डी.एस.आर. नुसार तयार केलेले असावे.

९) या योजनेअंतर्गत वस्तूंची खरेदी शासनाच्या अद्ययावत उपलब्ध दरकरारानुसार करण्यात यावी.

१०) इमारतीच्या बांधकामाचा/दुरुस्तीचा प्रस्ताव असल्यास संस्थेच्या मालकीच्या जागेसंदर्भातील पी.आर.कार्ड/गांव नमुना क्र.७/१२ चा उतारा/ भाडेपट्टा करार

११) संबंधित संस्थेचे मागील चार वर्षापैकी तीन वर्षाचे वार्षिक अहवाल (लेखापरिक्षण झालेले लेखे (ताळेबंद पत्रकासह))

प्रस्तावासोबत उपरोक्त कागदपत्रे प्राप्त झाली नसल्यास ती सादर करण्यासाठी जिल्हाधिकारी यांनी छाननी केल्यापासून दोन आठवड्याची मुदत देण्यात येईल, विहित मुदतीनंतरही कागदपत्रे प्राप्त न झाल्यास प्रस्ताव अपात्र ठरविण्यात येतील.

**ड) <u>योजनेच्या अटी व शर्ती :-</u>**

**१)** संबंधित शाळा, कनिष्ठ महाविद्यालये, औद्योगिक प्रशिक्षण संस्थामध्ये **७०%** व अपंग शाळामध्ये **५०%** विद्यार्थी हे अल्पसंख्यांक समुदायातील असणे अनिवार्य आहे.

त्याकरीता गट शिक्षणाधिकारी/शिक्षण निरिक्षक/ सहसंचालक, व्यवसाय प्रशिक्षण यांचे प्राधिकृत प्रतिनिधी यांचे विहीत प्रपत्र-३ मधील प्रमाणपत्र जोडणे आवश्यक आहे. **(जिल्हा विशेष समाज कल्याण अधिकारी यांच्या अधिपत्याखाली असलेल्या अपंग/निवासी शाळांच्या बाबतीत जिल्हा विशेष समाज कल्याण अधिकारी यांचे स्वाक्षरीचे प्रमाणपत्र असणे आवश्यक आहे.)**

२) **इच्छुक शाळांनी त्यांचा DIES CODE व औद्योगिक प्रशिक्षण संस्थानी त्यांचा Institute Code व अपंग शाळांनी त्यांचा लायसन्स क्रमांक नमूद करणे बंधनकारक आहे. सदर Code/लायसन्स क्रमांक नमूद न केलेले किंवा चुकीचा Code/लायसन्स क्रमांक नमूद केलेले प्रस्ताव अनुदानासाठी ग्राह्य धरले जाणार नाहीत.**

३) **एका DIES CODE/Institute Code/लायसन्स क्रमांकासाठी फक्त एकदाच अनुदान देण्यात येईल तथापि, एकाच इमारतीत / आवारात एकाच संस्थेच्या प्राथमिक, माध्यमिक, उच्च माध्यमिक अशा वेगवेगळया शाळा/महाविद्यालये हे दिवसभरातील स्वतंत्र वेळापत्रकानुसार वेग वेगळया पाळीत / सत्रात भरत असतील आणि त्यांचे DIES CODE वेगवेगळे असतील अशा परिस्थितीत त्या इमारतीसाठी/आवारासाठी या DIES CODEs पैकी फक्त एकाच DIES Code साठी अनुदान मंजूर करण्यात येईल.**

४) सदर योजनेंतर्गत शाळा, कनिष्ठ महाविद्यालय , अपंग शाळांनी व औद्योगिक प्रशिक्षण संस्था यांनी यापुर्वी ज्या प्रयोजनार्थ अनुदान प्राप्त केले आहे, ते त्याच प्रयोजनार्थ उपयोगात आणले असल्याचे प्रमाणित करुन त्याबातचे विहित नमुन्यातील (प्रपत्र-५ गट शिक्षणाधिकारी/शिक्षण निरिक्षक/ उपशिक्षणाधिकारी/विशेष जिल्हा समाज कल्याण अधिकारी वर्ग-१/ सहसंचालक, व्यवसाय शिक्षण यांच्या प्रतिस्वाक्षरीचे उपयोगिता प्रमाणपत्र सादर करणे बंधनकारक राहील.

५) सदरील योजने अंतर्गत पात्र होण्यासाठी संबंधीत शाळा,कनिष्ठ महाविद्यालय व औद्योगिक प्रशिक्षण संस्था यांना शासनाकडून मान्यता मिळालेली असणे आवश्यक आहे. अपंग शाळांच्या बाबतीत समाज कल्याण संचालनाया मार्फत प्राधिकृत अधिकाऱ्याची मान्यता असणे आवश्यक आहे.

६) शाळेस अनुदान प्राप्त झाल्यानंतर संबंधीत शाळांनी त्यांच्या प्रस्तावात उल्लेख केलेल्या कामासाठी अनुदानाचा योग्यरित्या वापर करुन त्याबाबतचे गट शिक्षणाधिकारी / शिक्षणाधिकारी/ सहसंचालक,उच्च व तंत्र शिक्षण विभाग यांच्या प्रतीस्वाक्षरीचे उपयोगिता प्रमाणपत्र प्रपत्र-५, देयके, फोटो, इत्यादीसह जिल्हाधिकारी यांच्याकडे अनुदान प्रत्यक्ष प्राप्त झाल्याच्या दिनांकापासून तीन महिन्याच्या आत सादर करणे बंधनकारक राहील. खरेदीच्या पावत्यांमध्ये VAT कपात दर्शविलेली असावी. उपयोगीता प्रमाणपत्रावर स्वाक्षरी करण्यापूर्वी गट शिक्षणाधिकारी/ शिक्षणाधिकारी/ सहसंचालक, उच्च व तंत्र शिक्षण विभाग यांनी प्रत्यक्ष साहीत्य/वस्तूंची तसेच

पावत्यांची तपासणी करुन खात्री करणे आवश्यक आहे. सर्व शाळांनी या योजनेतर्गत खरेदी केलेल्या साहीत्य/वस्तुंची स्वतंत्र जडसंग्रह नोंदवहीत नोंद घ्यावी. या नोंदी गट शिक्षणाधिकारी /जिल्हा नियोजन अधिकारी यांनी पडताळणी करुन प्रमाणीत कराव्यात. बांधकामासंदर्भात संबंधित वास्तुशास्त्रज्ञ यांनी दिलेला बांधकाम पूर्णत्वाचा दाखला प्राप्त करावा. सदरील योजनेतून निर्माण केलेल्या मत्ता Assets ची स्वतंत्र नोंदवही ठेवावी. वस्तु/इमारत यावर अल्पसंख्याक विकास विभाग, महाराष्ट्र शासन यांचे अनुदानातून असे लिहिणे आवश्यक आहे.

संस्थांनी परिपूर्णरित्या भरलेले अर्ज आवश्यक त्या कागदपत्रांसह संबंधित जिल्हयाच्या जिल्हाधिकाऱ्यांकडे ऑगस्ट अखेर पर्यंत सादर करणे आवश्यक राहील. विहित मुदतीनंतर प्राप्त झालेले प्रस्ताव कोणत्याही स्तरावर स्विकारले जाणार नाहीत.

इ) <u>**योजनेची कार्यपध्दती :-**</u>

१) या योजनेच्या विस्तृत प्रसिध्दीसाठी शासनातर्फे राज्यातील प्रमुख वृतपत्रात जाहिरात देण्यात येईल. या जाहीरातीनुसार सदर योजनेंतर्गत अनुदान मिळविण्यास इच्छुक असलेल्या लाभार्थ्यांनी प्रस्तुत शासन निर्णयातील अटी व शर्तीची पुर्तता करुन सोबतच्या प्रपत्र-१ मध्ये दर्शविलेल्या विहित नमुन्यात संबंधित जिल्हाधिकारी यांच्याकडे परिपूर्ण प्रस्ताव विहित मुदतीत सादर करणे आवश्यक असेल. मुदतीनंतर प्राप्त झालेले प्रस्ताव स्विकारले जाणार नाहीत.

२) योजनेंतर्गत प्राप्त प्रस्तावांची छाननी करण्याकरिता खालील प्रमाणे उच्चस्तरीय निवड समिती राहील.

| | | |
|---|---|---|
| i. | जिल्हाधिकारी | अध्यक्ष |
| ii. | कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग/जिल्हा परिषद (बांधकाम) | सदस्य |
| iii. | शिक्षण अधिकारी (प्राथमिक/माध्यमिक) | सदस्य |
| iv. | सह संचालक, व्यवसाय शिक्षण विभाग यांचे प्राधिकृत प्रतिनिधी | सदस्य |
| v. | जिल्हा नियोजन अधिकारी | सदस्य सचिव |

३) संबंधीत शाळांकडून उपरोक्त मुद्दा क्र. १ प्रमाणे विहित मुदतीत प्राप्त झालेल्या सर्व प्रस्तावांची संबंधित जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखालील उच्चस्तरीय निवड समिती या शासन निर्णयातील विहीत निकष, अटी व शर्तीनुसार छाननी करील. छाननी मध्ये प्रस्तावा सोबत सादर करावयाची कागदपत्रे किंवा अन्य दस्ताऐवज जोडले नसतील तर त्या त्रुटींची पुर्तता करण्यासाठी संबंधित शाळेला कळवून त्यांना योग्य अवधी (**जास्तीत जास्त दोन आठवडे**) देण्यात येईल. तदनंतर संबंधित जिल्हाधिकारी यांनी परिपूर्ण

प्रस्ताव शासनाकडे विहीत मुदतीत पाठवणे आवश्यक असेल. **मुदतीनंतर प्राप्त झालेले प्रस्ताव स्विकारले जाणार नाहीत.**

४) शाळांची शिफारस करण्याबाबतचे अधिकार जिल्हास्तरीय उच्चस्तरीय निवडसमितीला राहतील. पात्र शाळांचीच शिफारस करण्याबाबत सदरील समिती जबाबदार राहील.

५) समितीच्या अंतिम छाननीअंती निवडसमितीने पात्र ठरवून निवड केलेल्या शाळांची यादी संबंधित जिल्हाधिकारी निधी मागणीसाठी प्रपत्र-६ नुसार अल्पसंख्यांक विकास विभागाला विहित मुदतीत सादर करतील. **त्यानंतर प्राप्त होणारे प्रस्ताव ग्राहय धरले जाणार नाहीत.**

६) जिल्हाधिकारी यांचेकडून प्राप्त यादी नुसार **शासनाकडून संबंधित आर्थिक वर्षात उपलब्ध निधीच्या मर्यादेत शासनाने निर्धारित केलेल्या प्राथम्यक्रमाने निधी उपलब्ध करुन देण्यात येईल. जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखालील समितेने शिफारस केली म्हणून कोणत्याही शाळेस अनुदानाचा अधिकार किंवा हक्क प्राप्त होत नसून दरवर्षी उपलब्ध निधीच्या मर्यादेत व शासन निर्णयातील सर्व अटी व शर्तींची पूर्तता करणा-या पात्र शाळांनाच अनुदान मंजूर करण्यात येईल.**

७) **शासनाची सर्व प्रकारची प्रदाने ही धनादेशाव्दारे न करता NEFT व्दारे** करणे अनिवार्य असल्यामुळे संबंधीत शाळांच्या खाती रक्कम जमा करण्याची जबाबदारी जिल्हाधिकारी /सदस्य सचिव यांची राहील.**यासाठी शाळा/कनिष्ठ महाविद्यालय/अपंग शाळा यांचे राष्ट्रीयकृत बॅकेत खाते असणे आवश्यक आहे.**

८) सदर योजनेंतर्गत मिळालेल्या अनुदानातून निर्माण केलेल्या सुविधांची तपासणी संबंधित जिल्हाधिकारी / जिल्हयाचे शिक्षणाधिकारी / शासनाचे अधिकारी यांचेकडून संबंधित शाळेला प्रत्यक्ष भेट देऊन तपासणी करण्यात येईल. तपासणीमध्ये अनियमितता आढळल्यास संबंधित संस्था/शाळेविरुध्द जिल्हा उच्चस्तरीय निवड समितीमार्फत यथायोग्य कारवाई करण्यात येईल.

९) सदर योजनेंर्तगत उद्‌भवणा-या तक्रारीचे निराकरण करण्यासाठी ‘ योजनेच्या कार्यपध्दतीमध्ये अ.क्र. २)’ येथे नमूद उच्चस्तरीय निवड समितीस प्राधिकृत करण्यात येत आहे.

१०) **स्वंय-अर्थसहाय्यित शाळा सदर योजनेसाठी पात्र असणार नाहीत.**

११) **योजनेच्या अंमलबजावणीचा कालबध्द कार्यक्रम शासनामार्फत प्रतिवर्षी राज्यातील प्रमुख वृत्तपत्रामध्ये प्रसिध्द करण्यात येईल.**

या योजनेसाठी होणारा खर्च मागणी क्रमांक झेडई-१, मुख्य लेखाशिर्ष २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाज कल्याण, २०० इतर कार्यक्रम, राज्य योजनांतर्गत योजना (०१)(२१) अल्पसंख्यांक शाळांना पायाभुत सुविधा पुरविण्या करिता सहायक अनुदान (२२३५-ए-३४७) ३१

सहायक अनुदान या लेखा शिर्षाखाली दर्शविण्यात येईल व त्या त्या आर्थिक वर्षात या शिर्षाखाली उपलब्ध तरतुदीतुन भागविण्यात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५१००७१८४८३६९५१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ainul C Attar

Digitally signed by Ainul C Attar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Joint Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Ainul C Attar
Date: 2015.10.07 18:50:24 +05'30'

**( अैनुल अत्तार )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.राज्यपालांचे सचिव,
२) मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
३) मा.मंत्री / मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
४) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन,
५) अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव / सचिव सर्व मंत्रालयीन विभाग,
६) महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर,
७) महालेखापाल १/२ (लेखापरीक्षा) , मुंबई / नागपूर,
८) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
९) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
१०) सर्व विभागीय आयुक्त,
११) आयुक्त, शालेय शिक्षण
१२) आयुक्त, सामाजिक न्याय,
१३) सर्व जिल्हाधिकारी,
१४) सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
१५) संचालक, सामाजिक न्याय
१६) सर्व मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद
१७) संचालक, प्राथमिक शिक्षण
१८) संचालक, माध्यमिक शिक्षण
१९) शिक्षण अधिकारी (अल्पसंख्याक व प्रौढ/निरंतर शिक्षण)
२०) संचालक, व्यवसाय प्रशिक्षण
२१) सर्व जिल्हा नियोजन अधिकारी,
२२) सर्व समाजकल्याण अधिकारी

२३) सर्व मुख्य कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग,

२४) महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय (प्रसिध्दीसाठी),

२५) निवडनस्ती (का-६).

## जोडलेल्या कागदपत्रांची सूची

१) पूर्ण भरलेला अर्ज .( **प्रपत्र-१)**

२) शाळेने **प्रपत्र-१** च्या अनुषंगाने सादर करावयाचे स्वयंसाक्षांकित प्रतिज्ञापत्र **(प्रपत्र-२)**

३) संस्थेच्या नोंदणी प्रमाणपत्राची सत्यप्रत.

४) संस्थापन समयलेखे/ पोटनियम/ ट्रस्ट डीडची सत्यप्रत.

५) संस्थेच्या सदस्यांची सत्यापित यादी . **(प्रपत्र-३)**

६) संस्थेच्या व्यवस्थापन समितीच्या विद्यमान विश्वस्त /सदस्य यांची नांवे दर्शविणाऱ्या धर्मादाय आयुक्तांमार्फत प्रदान करण्यात आलेल्या **अनुसूची-I** ची प्रत किंवा संस्थेच्या व्यवस्थापन समितीच्या विश्वस्त / सदस्यांच्या नांवात बदल झाला असल्यास धर्मादाय आयुक्तांनी संस्थेस प्रदान केलेल्या **फेरफार अहवालाची प्रत (अनुसूची-III).**

८) मागील **चार पैकी तीन** वर्षांचे वार्षिक अहवाल/ लेखापरिक्षण झालेले लेखे (ताळेबंद पत्रकासह).

**९) शाळा सुरु करण्यासाठी शासनाकडून मिळालेल्या मान्यतेच्या पत्राची प्रत.**

१०) संस्थेच्या मालकीच्या मालमत्तेसंदर्भातील पी.आर.कार्ड/गांव नमूना क्र.७/१२ चा उतारा इ.च्या सत्यप्रती.

११) दुरुस्ती संदर्भातील आर्किटेक्ट/ लायसेंस्ड इंजिनीयर यांनी प्रचलित डी.एस.आर.नुसार तयार केलेले तपशीलवार **अंदाजपत्रक किंवा** खरेदी करावयाच्या वस्तूं संदर्भात मागविलेल्या **दरपत्रकांच्या** प्रती.

१२) शासनमान्य पटसंख्येचा गट शिक्षणाधिकारी/शिक्षण निरिक्षक/ उप शिक्षणाधिकारी /यां सहसंचालक,उच्च व तंत्र शिक्षण विभाग याच्याकडील दाखला. **(प्रपत्र-४)**

१३) शाळेच्या इमारतीचे/ दुरुस्ती करावयाच्या भागाचे पोस्ट कार्ड आकाराचे **रंगीत छायाचित्र.**

१४) या योजनेंतर्गत मागील वर्षी अनुदान मंजूर करण्यात आले असल्यास ते ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आले आहे ते त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्यात आले असल्याबाबतचे गट शिक्षण अधिकारी/शिक्षण निरीक्षक/उप शिक्षणाधिकारी/ सहसंचालक,उच्च व तंत्र शिक्षण विभाग यांच्या प्रतिस्वाक्षरीचे विहीत नमुन्यातील उपयोगिता प्रमाणपत्र **(प्रपत्र - ५)** किंवा त्याची **सत्यप्रत.**

| संस्थेच्या **अध्यक्षांचे** गट शिक्षण अधिकारी/ शिक्षण निरिक्षक/ उप शिक्षणाधिकारी यांनी सांक्षाकित केलेले छायाचित्र | संस्थेच्या **सचिवांचे** गट शिक्षण अधिकारी/ शिक्षण निरिक्षक/ उप शिक्षणाधिकारी यांनी सांक्षाकित केलेले छायाचित्र |
|---|---|

**प्रपत्र – १**

## महाराष्ट्र शासन, अल्पसंख्याक विकास विभाग

## अल्पसंख्याक खाजगी शाळा, कनिष्ठ महाविद्यालये व अपंग शाळांमध्ये पायाभूत सुविधा पुरविण्यासाठी अनुदान योजना अर्जाचा नमूना

१) अ) शाळेचे पूर्ण नांव :

ब) पत्रव्यवहाराचा पूर्ण पत्ता (दूरध्वनी आणि ईमेलसह) :

**क) शाळेचा DIES Code / औ.प्र.सं. चा Institute code/**
**अपंग शाळाचा Licence code :**

२) शाळा चालविणाऱ्या संस्थेचे :
नांव व पूर्ण पत्ता (दूरध्वनीसह)

i. मुख्याध्यापका/प्राचार्याचे नाव :

४) शाळा/कनिष्ठ महाविद्यालय /अपंग शाळा /
औद्योगिक प्रशिक्षण संस्था यांचा राष्ट्रीय बँकेतील
बँक खाते क्रमांक व IFSC कोड :

५) अ)संस्थेच्या नोंदणीचा क्रमांक व संबंधीत अधिनियम :
सहकारी संस्था नोंदणी कायदा, १८६० अंतर्गत :
सार्वजनिक न्यास नोंदणी अधिनियम, १९५० अंतर्गत :
वक्फ अधिनियम, १९९५ अंतर्गत :
इतर कोणत्याही कायद्यांतर्गत :
ब) शिक्षण विभागाच्या मान्यतेची तारीख व तपशील :

७) शाळेमध्ये मंजूर आणि चालू इयत्ता/ तुकडया :

| इयत्तेचे स्वरुप | इयत्ता | तुकडया | विद्यार्थी संख्या |
|---|---|---|---|
| मंजूर | | | |
| चालू | | | |

८) अ) शाळा / कनिष्ठ महाविद्यालय / अपंग शाळा
कोणता अभ्यासक्रम शिकविते ? :
(एस.एस.सी./सी.बी.एस्.ई./आ.य.सी.एस्.ई./इतर)

ब) माध्यम : मराठी/उर्दू/ इंग्रजी/हिंदी/इतर

९) शाळा / कनिष्ठ महाविद्यालय / अपंग शाळां / औद्योगिक प्रशिक्षण संस्थामधील शिक्षक/शिक्षिकांची विषयनिहाय व अर्हतानिहाय संख्या

१०) शाळा / कनिष्ठ महाविद्यालय / अपंग शाळां/ औद्योगिक प्रशिक्षण संस्थामधील सोयी सुविधा :

अ) शाळा / कनिष्ठ महाविद्यालय /अपंग शाळा/ औद्योगिक प्रशिक्षण संस्था :
संस्थेच्या मालकीच्या इमारतीमध्ये
चालविली जाते की भाडयाच्या इमारतीमध्ये ?
कागदपत्रासह तपशील द्यावा.

ब)

i) आवश्यक बांधकाम (प्रयोजन व आवश्यक क्षेत्रफळ )

११) शाळा /कनिष्ठ महाविद्यालय / अपंग शाळेमध्ये/ औद्योगिक प्रशिक्षण संस्थामधील उपलब्ध स्वच्छतागृहांची माहिती :

| स्वच्छतागृह | संख्या | क्षेत्रफळ |
|---|---|---|
| महिला | | |
| पुरुष | | |

१२) शाळा / कनिष्ठ महाविद्यालय / अपंग शाळामधील/ औद्योगिक प्रशिक्षण संस्थामधील पिण्याच्या पाण्याच्या सुविधांचा तपशील :

१३) मागणीच्या रकमेचा तपशील

| अ. क्र. | निर्माण करावयाच्या सुविधा | संख्या | दुरुस्तीची/बांधकामांची/ खरेदीची किंमत प्रति नग | आवश्यक रक्कम रुपये | शेरा |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| **१** | **शाळा / कनिष्ठ महाविद्यालये / अपंग शाळेच्या/ औद्योगिक प्रशिक्षण संस्थामधील इमारतीची दुरुस्ती/ नूतनीकरण** | | | | |
| | अ) शाळा खोल्यांची डागडुजी/दुरुस्ती | | | | |
| | ब) छत दुरुस्ती | | | | |
| | क) शाळा खोल्या मध्ये फरशी बसविणे | | | | |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| २ | **पिण्याच्या पाण्याची सुविधा** (कूलर/फिल्टर सह) | | | | |
| ३ | **ग्रंथालयासाठी** | | | | |
| | अ) शैक्षणिक साहित्य/ किट्स खरेदी | | | | |
| | ब) बुक बँक/ क्रमिक पुस्तके खरेदी | | | | |
| | क) इतर पुस्तके खरेदी | | | | |
| ४ | **प्रयोग शाळा उभारणे/ अद्ययावत करणे (सविस्तर तपशिल द्यावा)** | | | | |
| ५ | **संगणक कक्ष** | | | | |
| | अ) संगणक संख्या | | | | |
| | ब) प्रिंटर्स | | | | |
| | क) सॉफटवेअर्स | | | | |
| | ड) इतर साहित्य | | | | |
| ६ | **स्वच्छतागृहे** | | | | |
| | अ)स्वच्छता गृहांची दुरुस्ती | | | | |
| | ब) नवीन स्वच्छतागृहे बांधणे | | | | |
| ७ | **विद्यार्थ्यांसाठीचे फर्निचर** | | | | |
| | अ) बेंचेस/डेस्क/टेबल नवीन खरेदी | | | | |
| ८ | **इनव्हर्टरची सुविधा निर्माण करणे (मुंबई शहर व उपनगरे वगळून)** | | | | |
| ९ | **झेरॉक्स मशीन (माध्यमिक शाळा व महाविद्यालयांसाठी)** | | | | |
| १० | **अध्यापनाची साधने (Teaching Material) एल.सी.डी. प्रोजेक्टर, अध्यापनासाठी लागणारे विविध सॉफ्टवेअर, इत्यादी** | | | | |
| ११ | **ई-लर्नींग सुविधा निर्माण करणे/ लॅग्वेज लॅब (हायस्कूल व कनिष्ठ महाविद्यालये)** | | | | |
| १२ | **संगणक हार्डवेअर/ सॉफ्टवेअर** | | | | |
| | **एकूण** | | | | |

१४ ) मागणी केलेली एकूण रक्कम रु.

१५ ) या योजनेंतर्गत पूर्वी अनुदान घेतले आहे काय ? तपशील द्यावा

| अ.क्र. | आर्थिक वर्ष | रक्कम | प्रयोजन |
|---|---|---|---|
| | | | |
| | | | |

**१६** योजनेंतर्गत लाभ मिळालेल्या प्रयोजनासाठीच निधीचा वापर केला असल्याबद्दलचे प्रमाणपत्र आणि उपयोगिता प्रमाणपत्र जोडले आहे काय ? होय / नाही

**मी/** आम्ही श्री./श्रीमती ..................................व श्री./श्रीमती ...................... असे प्रमाणित करतो की,आमच्या ...................................संस्थेव्दारा संचलित .................................... या शाळा / कनिष्ठ महाविद्यालय / अपंग शाळां/ औद्योगिक प्रशिक्षण संस्थासाठी अनुदान मागणी संदर्भात उपरोक्त दिलेल्या सर्व माहितीची पडताळणी केली असून सर्व माहिती सत्य व बरोबर आहे.

सही -

नांव -

हुद्दा - मुख्याध्यापक/प्राचार्य सचिव अध्यक्ष

शिक्का -

## (अल्पसंख्याक खाजगी शाळा / कनिष्ठ महाविद्यालय, औद्योगिक प्रशिक्षण संस्था,अपंग शाळेमध्ये पायाभूत सुविधा पुरविण्यासाठी अनुदान योजना )

## प्रतिज्ञापत्राचा नमुना

## प्रपत्र - २

मी/ आम्ही श्री./श्रीमती ..................................व श्री./श्रीमती ....................... असे प्रमाणित करतो की, आमच्या .....................................संस्थेव्दारा संचलित .................................. या शाळेसाठी अल्पसंख्याक बहुल खाजगी शाळांना / कनिष्ठ महाविद्यालय / अपंग शाळांना/ औद्योगिक प्रशिक्षण संस्थाना पायाभूत सोयी-सुविधा उपलब्ध करुन देण्याबाबतच्या महाराष्ट्र शासन, अल्पसंख्याक विकास विभागाच्या योजनेंतर्गत विहित नमुन्यातील अर्ज आवश्यक त्या सर्व कागदपत्रांसह सादर केला आहे. अनुदान मागणी संदर्भात अर्जामध्ये दिलेल्या सर्व माहितीची मी / आम्ही पडताळणी केली असून सर्व माहिती सत्य व बरोबर आहे. मी / आम्ही प्रपादन करतो की, आमच्या शैक्षणिक संस्थेव्दारा संचलित शाळेमध्ये / कनिष्ठ महाविद्यालयामध्ये/ औद्योगिक प्रशिक्षण संस्थामध्ये ७० % व अपंग शाळेमध्ये ५०% पेक्षा जास्त विद्यार्थी अल्पसंख्याक समाजाचे आहेत. अर्जामध्ये अनुदान मागणी केलेल्या पायाभूत सोयी-सुविधा आमच्या शाळेसाठी / कनिष्ठ महाविद्यालय / औद्योगिक प्रशिक्षण संस्था/अपंग शाळेसाठी आवश्यक असून या योजनेंतर्गत निधी उपलब्ध झाल्यास सदर निधी अर्जामध्ये प्रस्तावित केलेल्या पायाभूत सोयी-सुविधांसाठी योग्यरित्या वापरला जाईल. मी / आम्ही असेही प्रपादन करतो की, या निधीचा गैरवापर झाल्यास अथवा अर्जामधील माहिती असत्य आढळून आल्यास आमच्या विरुध्द / संस्थेविरुध्द भा.दं.सं. कलम १९३(२) अन्वये कायदेशीर / दंडात्मक कार्यवाही केली जाऊ शकते तसेच संस्थेचा अर्ज रद्दबातल ठरु शकतो आणि मंजूर अनुदान व्याजासह शासनास परत केले जाईल याची आम्हांस जाणीव आहे.

मी / आम्ही याव्दारे हमी देतो की आमच्या संस्थेस मंजूर झालेल्या अनुदानाचे उपयोगिता प्रमाणपत्र **(प्रपत्र - ५ नुसार)** खरेदीच्या पावत्यांच्या सत्यप्रतीसह संस्था अनुदान मंजूरीच्या तारखेपासून **९० दिवसांच्या आंत** शासनास सादर करेन.

सही -

नांव -

हुद्दा - मुख्याध्यापक/ प्राचार्य सचिव अध्यक्ष

शिक्का -

**(अल्पसंख्याक खाजगी शाळा / कनिष्ठ महाविद्यालय , अपंग शाळां, औद्योगिक प्रशिक्षण संस्था मध्ये पायाभूत सुविधा पुरविण्यासाठी अनुदान योजना)**

**<u>प्रपत्र - ३</u>**

**संस्थेच्या सदस्यांची यादी (अनुसूची १/३ अनुसार )**

| अ.क्र. | सदस्याचे पूर्ण नाव<br>(आडनांव प्रथम) | आधार क्रमांक | पूर्ण पत्ता<br>दूरध्वनी क्रमांक | हुद्दा |
|---|---|---|---|---|
| | | | | |
| | | | | |
| | | | | |
| | | | | |
| | | | | |
| | | | | |
| | | | | |

सही -

नांव -

हुद्दा - मुख्याध्यापक/ प्राचार्य सचिव अध्यक्ष

शिक्का -

## प्रपत्र -४

## इयत्ता निहाय विद्यार्थी संख्या

प्रमाणित करण्यात येते की, .................................................................. या संस्थेव्दारा संचलित.............................................................. या शाळा / कनिष्ठ महाविद्यालय / अपंग शाळांस/ औद्योगिक प्रशिक्षण संस्थामध्ये वर्ष ................. साठी खालील तक्त्यात नमूद केलेली विद्यार्थ्यांची पटसंख्या मंजूर करण्यात आली आहे. असे ही प्रमाणित करण्यात येते की, संस्थेने अर्जामध्ये केलेली मागणी वाजवी असून संस्थेस आर्थिक मदत मंजूर करण्यास शिफारस आहे.

| **अ. क्र.** | **इयत्ता** | | **विद्यार्थी संख्या** | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | **मुले** | **मुली** | **अल्पसंख्याक** | | | | | | | **सर्व - साधारण** | **एकूण** |
| | | | | मुस्लिम | बौध्द | ख्रिश्चन | जैन | शीख | पारसी | टक्के वारी | | |
| | | | | | | | | | | | | |
| | | | | | | | | | | | | |
| **एकूण** | | | | | | | | | | | | |

धार्मिक अल्पसंख्याक विद्यार्थ्यांची संख्या :-

सर्वसाधारण प्रवर्गातील विद्यार्थ्यांची संख्या :-

एकूण विद्यार्थी संख्या :-

अल्पसंख्याक विद्यार्थ्यांची टक्केवारी :-

सही -

नांव -

हुद्दा - गट शिक्षणअधिकारी/ शिक्षण निरिक्षक/ उप शिक्षणाधिकारी/समाजकल्याण अधिकारी/सह संचालक,उच्च व तंत्र शिक्षण .

शिक्का - ................

जिल्हा - ...............

# प्रपत्र -५
## उपयोगिता प्रमाणपत्र

मी/आम्ही श्री .............................................................................. आणि श्री.......................................................................... असे प्रमाणित करतो की, महाराष्ट्र शासन, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई मार्फत अल्पसंख्याक खाजगी शाळा / कनिष्ठ महाविद्यालय / औद्योगिक प्रशिक्षण संस्था/अपंग शाळेमध्ये पायाभूत सुविधा पुरविण्यासाठी अनुदान योजनेंतर्गत आमच्या.............................................................................................या संस्थेच्या ....................................................................... या शाळेस /कनिष्ठ महाविद्यालयास / अपंग शाळेस वर्ष २० - २० मध्ये मंजूर झालेल्या रु.......................... (अक्षरी रुपये......................................................) एवढया अनुदानाचा उपयोग आम्ही खालील प्रयोजनांसाठी केला आहे आणि सदर अनुदान ज्या बाबींसाठी मंजूर करण्यात आले होते त्याच प्रयोजनांसाठी खर्च करण्यात आले आहे.

| अनु.क्र. | तपशील | खर्च (रु.) |
|---|---|---|
| १ | | |
| २ | | |
| ३ | | |
| ४ | | |
| ५ | | |
| | एकूण रु. | |

आम्ही असेही प्रमाणित करतो की, सदर खर्च विहित पध्दतीचा अवलंब करुनच करण्यात आला आहे.

प्रतिस्वाक्षरी
सही - नांव-

सही -
नांव -
मुख्याध्यापक/प्राचार्य सचिव अध्यक्ष

गटशिक्षणधिकारी/शिक्षणनिरिक्षक/उपशिक्षणाधिकारी/
जिल्हा समाज कल्याण अधिकारी वर्ग-१ /सह
संचालक,उच्च व तंत्र शिक्षण
शिक्का -

पालक शिक्षण संघटना यांचे अध्यक्ष
शिक्का -

**शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग, क्र.अविवि-२०१५/प्र.क्र. /१५/का-६, दि. , २०१५ सोबतचे सहपत्र**

## प्रपत्र-६

## ( अल्पसंख्यांक विकास विभागास सादर करतेवेळी जिल्हाधिकारी कार्यालयाने भरावयाचे )

अनुक्रमांक :

संस्थेचे नाव व संपूर्ण पत्ता (दूरध्वनी / भ्रमणध्वनीसह) : ----------------------------------------
----------------------------------------

शाळेचे नाव व संपूर्ण पत्ता (दूरध्वनी / भ्रमणध्वनीसह) : ----------------------------------------
----------------------------------------

<table>
<tr><th>अ.क्र.</th><th>तपशील</th><th>आहे / नाही  किंवा तपशील</th></tr>
<tr><td>१.</td><td>प्रपत्र - १.प्रतिज्ञापत्र (स्वंयसाक्षांकित)</td><td></td></tr>
<tr><td>२.</td><td>प्रपत्र - २  सदस्यांची यादी</td><td></td></tr>
<tr><td>३.</td><td>शाळेचा/औ.प्र.सं,/अपंग शाळेचा  DIES/Institute/Licence Code</td><td></td></tr>
<tr><td>४.</td><td>प्रपत्र - ३ पटसंख्येचा दाखला ( ७०% अल्पसंख्याक विद्यार्थी असल्याबाबत) (पटसंख्या , प्रत्यक्ष उपस्थित विद्यर्थिसंख्या व टक्केवारी नमूद करावी)</td><td></td></tr>
<tr><td>५.</td><td>प्रपत्र- ४ आगाऊ पावती</td><td></td></tr>
<tr><td>६.</td><td>ट्रस्ट डीडची सत्यप्रत<br>१)धर्मादाय आयुक्तांकडून प्राप्त अनुसूची - १  किंवा<br>२)फेरफार अहवालाची प्रत (अनुसूची- (३) )</td><td></td></tr>
<tr><td>७.</td><td>नोंदणी प्रमाणपत्राची सत्यप्रत(नोंदणी क्र. व वर्ष नमूद करावे)</td><td></td></tr>
<tr><td>८.</td><td>शाळेला शासनाने प्रदान केलेल्या मान्यतेची प्रत (तपशील नमूद करावा) (अनुदानित/विना अनुदानित/कायम विना अनुदानित)</td><td></td></tr>
<tr><td>९.</td><td>पी.आर. कार्ड/गाव नमुना ७/१२ भाडे पावती</td><td></td></tr>
<tr><td>१०.</td><td>वार्षिक लेखे अहवाल (लगतच्या मागील चार पैकी ३ वर्षाचे,वर्ष नमूद करावे)</td><td></td></tr>
<tr><td>११.</td><td>दरपत्रकाची प्रत</td><td></td></tr>
<tr><td>१२.</td><td>अंदाजपत्रक (बांधकामा करिता मागणी केलेली असल्यास)</td><td></td></tr>
<tr><td>१३.</td><td>इमारतीचे छायाचित्र</td><td></td></tr>
<tr><td>१४.</td><td>मागणीची एकूण रक्कम व सुविधांचे स्वरुप</td><td></td></tr>
<tr><td>१५.</td><td>यापूर्वी दिलेला निधी कोणकोणत्या सुविधांसाठी देण्यात आलेला आहे वर्षनिहाय तपशिल</td><td><table><tr><td>वर्ष</td><td>निधी</td><td>प्रयोजन</td></tr><tr><td></td><td></td><td></td></tr><tr><td></td><td></td><td></td></tr></table></td></tr>
<tr><td>१६.</td><td>यापूर्वी निधी दिला असल्यास त्याची उपयोगिता प्रमाणपत्रे सादर केली आहेत का ?  ( वर्षनिहाय तपशील नमूद करावा )</td><td><table><tr><td>वर्ष</td><td>उपयोगिता प्रमाणपत्र प्राप्त/अप्राप्त</td></tr><tr><td></td><td></td></tr></table></td></tr>
<tr><td>१७.</td><td>समितीची शिफारस मान्य/ अमान्य</td><td></td></tr>
<tr><td>१८.</td><td>शासनातर्फे  अंतिमत: अनुदानास पात्र/अपात्र</td><td></td></tr>
</table>